विक्रीकर विभागातर्फे वर्तमानपत्रातून देण्यात येणाऱ्या जाहिराती खाजगी संस्थेमार्फत वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**वित्त विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : विकवि-१२१४/प्र.क्र.४२६/वि.प्र.४,**

मंत्रालय, मुंबई — ४०० ०३२.

दिनांक :- १७/०१/२०१५

**वाचा :-** (१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक पीयूबी-१०००/प्र.क्र.७३/२०००/३४, दि.०१.०५.२००१

(२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक जाहिरात-२००९/प्र.क्र.१३७/का.३४, दि.३१.०८.२००९

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र शासनामार्फत वृत्तपत्रांना/नियतकालिकांना देण्यात येणाऱ्या वर्गीकृत व दर्शनी जाहिरातींचे धोरण तत्कालीन राज्यमंत्री यांचे यांचे अध्यक्षतेखालील समितीने केलेल्या शिफारशींच्या अनुषंगाने शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक पीयूबी-१०००/प्र.क्र.७३/२०००/३४, दि.०१.०५.२००१ अन्वये प्रसृत करण्यात आले आहे. त्याचप्रमाणे शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक जाहिरात-२००९/प्र.क्र.१३७/का.३४, दि.३१.०८.२००९ अन्वये तसेच वेळोवेळी निर्गमित शुद्धिपत्रक/शासन निर्णय/परिपत्रक याद्वारे या धोरणात पुन्हा सुधारणा करण्यात आलेल्या आहेत.

विक्रीकर विभागातर्फे राबविल्या जाणाऱ्या कायद्यासंबंधी तसेच विविध कायद्याअंतर्गत राबविल्या जाणाऱ्या मोहिमासंबंधी व्यापारी वर्गाला व जनतेला माहिती व्हावी यासाठी विक्रीकर विभागातर्फे वर्तमानपत्रातून देण्यात येणाऱ्या जाहिराती खाजगी संस्थेमार्फत वितरीत करण्याबाबत, शासकीय जाहिरात वितरण धोरणातून सूट देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शासनाच्या विभागांनी जाहिरातीचे आर्टवर्क खाजगी अभिकरणांमार्फत करावे व अशा जाहिरातींचे वितरण माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाकडून करावे, या जाहिराती अभिकरणांमार्फत वितरीत करण्यात येऊ नये असे शासनाचे जाहिरात वितरण धोरण आहे. तथापि, विक्रीकर विभाग हा शासनाच्या महसूल उत्पन्नाचा महत्त्वाचा भाग आहे. महसूलात वाढ होण्याच्या दृष्टीने, विक्रीकर विभागाच्या जाहिराती वेळेवर प्रसिद्ध होणे आवश्यक आहे. यास्तव, विक्रीकर विभागातर्फे राबविल्या जाणाऱ्या कायद्यासंबंधी तसेच विविध कायद्याअंतर्गत राबविल्या जाणाऱ्या मोहिमासंबंधी व्यापारी वर्गाला व जनतेला माहिती व्हावी यासाठी विक्रीकर विभागातर्फे वर्तमानपत्रातून देण्यात येणाऱ्या जाहिराती,

खाजगी संस्थेमार्फत वितरीत करण्याबाबत, शासकीय जाहिरात वितरण धोरणातून, विक्रीकर विभागास विशेष बाब म्हणून १ वर्षासाठी सूट देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३२/३४, दि.१४.०१.२०१५ ला अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे व हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०११७१५०३१०२९०५ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

YASHWANT DATTATRAYA DESHKAR

Digitally signed by YASHWANT DATTATRAYA DESHKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finanace Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=YASHWANT DATTATRAYA DESHKAR
Date: 2015.01.17 15:14:06 +05'30'

**( य. द. देशकर )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२) विशेष विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
३) महालेखापाल (लेखापरीक्षा) १, महाराष्ट्र, मुंबई,
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १, महाराष्ट्र, मुंबई,
५) महालेखापाल (लेखापरीक्षा) २, महाराष्ट्र, नागपूर,
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) २, महाराष्ट्र, नागपूर,
७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१०) अपर मुख्य सचिव (वित्त) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
११) प्रधान सचिव (व्यय) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
१२) कार्यासन अधिकारी, प्रशासन-४/वि.प्र.१,२,३,
१३) निवड नस्ती (वि.प्र.४)